**“हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करणेबाबत.”**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : हातमाग २०२५/प्र.क्र.११/टेक्स ३**
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च २०२५.

**वाचा :**

१) शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र.सीटीएस-१०७२/३७९५/सी २ (१), दि.०५.१०.१९७२

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२००८/ प्र.क्र.९७ /टेक्स-३, दि.२९.०९.२००८

३) शासन निर्णय , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०१५/ प्र.क्र.१४७/टेक्स-३, दि.१७.१०. २०१६ व शासन शुध्दीपत्रक, दि.१८.०१.२०१७

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा. प्रशा-५ दिनांक १० मे, २०१६.

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०२२/ प्र.क्र.२२५ /टेक्स-३, दि.२५.०३.२०२३

६) शासन निर्णय क्र : सपववि-३८०१३/३१/२०२३/टेक्स ३.दि.०९ जानेवारी,२०२४

७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७ मार्च,२०२५

८)वस्त्रोद्योग आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे दि.०३ फेब्रुवारी,२०२५ रोजीचे पत्र

**प्रस्तावना:-**

राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देण्याकरिता व विणकरांनी उत्पादीत केलेल्या उत्कृष्ट वाणाला वाव मिळावा या दृष्टिकोनातून महाराष्ट्र शासनाकडून सन १९७२-७३ पासून राज्यातील हातमाग विणकराद्वारे उत्पादित कापडाचे उत्कृष्ट नमुन्यासाठी हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजना राबविण्यात येत आहे. दि.१७.१०.२०१६ रोजीच्या वस्त्रोद्योग विभागाच्या शासन निर्णयाद्वारे सदर योजनेची पुनर्रचना करण्यात आली असून बक्षिसाच्या रकमेतही वाढ करण्यात आलेली आहे व त्याचा वार्षिक आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. सन २०२४-२५ मध्ये हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजना राबविण्याकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीतून निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव वस्त्रोद्योग आयुक्तालयाच्या वर नमूद दि.०३.०२.२०२५ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

१. राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देण्याकरिता सन २०२४-२५ साठी हातमाग कापड स्पर्धा घेण्यात येवून बक्षीस वाटप करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. दिनांक १७ ऑक्टोबर,२०१६ च्या संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या विभागीय कापड स्पर्धा निवड समितीने विभागस्तरावरील विजेत्यांची व राज्यस्तरीय कापड स्पर्धा निवड समितीने राज्यस्तरावरील विजेत्यांची निवड करावी.

२. सदर स्पर्धेच्या बक्षिसांचे विवरण खालील प्रमाणे राहील

| स्पर्धेचे प्रकार व स्पर्धांची संख्या | पारंपारिक व अपारंपारिक वाणाकरीता प्रत्येक हातमाग परंपरागत वाणा करीता द्यावयाच्या बक्षिसाची रक्कम (रु.) | | | पारंपारिक व अपारंपारिक स्पर्धेच्या आयोजनाकरीता आवश्यक प्रशासकीय खर्चासाठी अर्थसहाय्याची रक्कम (रू.) | एकूण (रूपये) |
|---|---|---|---|---|---|
| | पहिले बक्षीस | दुसरे बक्षीस | तिसरे बक्षीस | | |
| राज्यस्तरीय हातमाग कापड स्पर्धा (फक्त एका ठिकाणी) | ५०,०००/- | ४०,०००/- | ३०,०००/- | ३०,०००/- | १,५०,०००/- |
| विभागीय हातमाग कापड स्पर्धा (एकूण ४ ठिकाणी) | १,००,०००/- (२५,०००/- प्रत्येकी) | ८०,०००/- (२०,०००/- प्रत्येकी) | ६०,०००/- (१५,०००/- प्रत्येकी) | ६०,०००/- (१५,०००/- प्रत्येकी) | ३,००,०००/- |
| | | | | एकूण | ४,५०,०००/- |

३. सदर हातमाग कापड स्पर्धा व बक्षीस योजने अंतर्गत “मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरिता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१ ०११९) ०५ बक्षिसे” या लेखाशिर्षाखाली रू.४,५०,०००/- (अक्षरी- रू. चार लाख पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम सन २०२४-२५ साठी मंजूर निधीतून वितरीत करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर हातमाग कापड स्पर्धा व बक्षीस योजनेंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रू.४.५० लाख इतका निधी विणकरांच्या स्पर्धेच्या आयोजनासाठी व बक्षिस

वितरणासाठी वितरीत करण्यासाठी सहायक संचालक (लेखा), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना या योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात येत आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

६. या योजनेच्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
७. स्पर्धेअंती विजेत्या हातमाग विणकरांना द्यावयाची बक्षिसे तसेच आयोजनाकरिता करण्यात येणाऱ्या खर्चाची देयके संबंधितांच्या बँक खात्यात ECS द्वारे थेट जमा करण्यात यावी.
८. या योजनेचा निधी खर्च करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच यासंबंधी शासनाच्या मार्गदर्शक सुचना व नियमांचे पालन कटाक्षाने करावे.

९. यावरील खर्च “मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरिता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१ ०११९) ०५ बक्षिसे” या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१०. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभाग/ अनौ. संदर्भ क्रमांक क्र. १६६/२०२५/व्यय-२, दि.१८.०३.२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२६१५५१०६७७०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN

Digitally signed by PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c6a8800841f0173430c13770d9d86bc16cf387b050d3c5c9ebcedbbd3dcf07f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D0F333CC391EF2D7D49DC6FD87E92EB9303FC9A19FD00938A0D8AE79AD2EB1F7, cn=PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN
Date: 2025.03.26 15:52:50 +05'30'

**( अंजुम र. पठाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२)प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर

५) उप सचिव (टेक्स ३), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) अवर सचिव १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१२) प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), मुंबई / नागपूर / छत्रपती संभाजीनगर / सोलापूर
१३) निवड नस्ती, कार्यासन/ टेक्स-३.